**उजनी धरण येथे १००० मे.वॅ. क्षमतेचा तरंगता सौर ऊर्जा प्रकल्प आस्थापित करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सौरप्र- २०१७/प्र.क्र.४७१/ऊर्जा-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २१ जून, २०१८

<u>वाचा</u>:- १) व्यवस्थापकीय संचालक, महावितरण यांचे क्र. एमएसईडीसीएल/बीपी फ्लोटिंग सोलर/ ११२७९, दि. १८ मे, २०१८

**<u>प्रस्तावना:</u>**

नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीचे अनन्यसाधारण महत्व लक्षात घेऊन केंद्र शासनाने अशा ऊर्जा स्त्रोतांव्दारे देशात सन २०२२ पर्यंत १७५ गिगावॅट एवढा वीजनिर्मितीचा विस्तार करण्याचे उद्दिष्ट जाहीर केले आहे. यामध्ये १०० गिगावॅट सौर ऊर्जा निर्मितीचा समावेश आहे. त्या दृष्टीने देशभरात व राज्यांमध्ये नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून वीजनिर्मितीचे कार्यक्रम हाती घ्यावयाचे आहेत.

राज्यात नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोत मुबलक प्रमाणात आहेत. त्यातील पवन व सौर यासारख्या स्त्रोतांबरोबरच ऊसाची चिपाडे, कृषिजन्य टाकाऊ पदार्थ, सेंद्रिय टाकाऊ पदार्थ, वैद्यकीय टाकाऊ पदार्थ, खनिजजन्य व इतर टाकाऊ पदार्थांसह औद्योगिक टाकाऊ पदर्थांसारख्या स्त्रोतांपासून वीज निर्मिती करता येणे शक्य आहे. या सर्व स्त्रोतांचे महत्व व बाब लक्षात घेऊन पवन ऊर्जेपासून वीज निर्मिती ऊसाची चिपाडे/कृषी अवशेषांवर आधारित सहवीज निर्मिती प्रकल्प लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्प कृषिजन्य टाकाऊ पदर्थ, सेंद्रिय टाकाऊ पदार्थ, वैद्यकीय टाकाऊ पदार्थ, खनिजजन्य व इतर टाकाऊ पदार्थासह औद्योगिक टाकाऊ पदार्थापासून वीज निर्मिती प्रकल्प व सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प अशा पारेषण संलग्न प्रकल्पांना चालना देण्यासाठी एकत्रित धोरण दिनांक २० जुलै, २०१५ रोजी जाहीर केले आहे.

राज्यातील ऊर्जेची वाढती मागणी लक्षात घेता, नवीन व नवीकरणीय (अपारंपरिक ) ऊर्जा स्त्रोतांचा विकास करणे अपरिहार्य आहे. जमिनीवरील उपलब्ध नैसर्गिक स्त्रोतांच्या वापरावर काही प्रमाणात मर्यादा येत असल्यामुळे राज्यात मोठया प्रमाणात उपलब्ध असलेल्या नदी/सागरे/ धरणांच्या पृष्ठभागाचा उपयोग करून तरंगते सौर ऊर्जा प्रकल्प राज्यात राबविण्यास मोठया प्रमाणात वाव आहे. ही बाब विचारात घेऊन राज्य शासनाने, उजनी धरण, जि. सोलापूर येथे जलाशयावर १००० मे.वॅ. क्षमतेचा तरंगता सौर ऊर्जा प्रकल्प आस्थापित करण्यासाठी महावितरण कंपनीस अंमलबजावणी संस्था (Implementing agency) म्हणून नियुक्त केले आहे. महावितरण कंपनीने सदर प्रकल्पासाठी स्वारस्याचे प्रकटीकरण (Expression of Interest) मागविले आहे. त्यास अनुसरून स्वारस्य धारकांकडून काही सूचना प्राप्त होत आहेत. सदर सूचनांचा विचार करण्यासाठी तसेच तरंगता सौर ऊर्जा प्रकल्पाच्या नविन तंत्रज्ञानाबाबत या क्षेत्रातील मर्यादित अनुभवाचा विचार करून तरंगता सौर ऊर्जा प्रकल्प आस्थापित करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या सर्व बाबी /कामकाज /कार्यपध्दती /अंमलबजावणी निश्चित करण्यासाठी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

उजनी धरण, जि. सोलापूर येथील जलाशयावर १००० मे.वॅ. क्षमतेचा तरंगता सौर ऊर्जा प्रकल्प आस्थापित करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या सर्व बाबी /कामकाज /कार्यपध्दती /अंमलबजावणी निश्चित करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

**अ) समितीची रचना:- सदर समितीत खालीलप्रमाणे सदस्य राहतील.**

| | | |
|---|---|---|
| १) | श्री. सतिश चव्हाण, संचालक (वाणिज्य), महावितरण | - अध्यक्ष |
| २) | मुख्य अभियंता, स्टेट ट्रान्समिशन युनिट | - सदस्य |
| ३) | मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), पुणे, जलसंपदा विभाग | - सदस्य |
| ४) | संचालक, पर्यावरण विभाग | - सदस्य |
| ५) | अतिरिक्त महासंचालक, महाऊर्जा | - सचिव |
| ६) | अधीक्षक अभियंता (न.ऊ.) महावितरण | - सदस्य सचिव |

**ब) समितीचे कार्य:-**

१) सदर प्रकल्पामुळे पर्यावरणावर होणाऱ्या परिणामांचा अभ्यास करणे.

२) सदर प्रकल्पासाठी पर्यावरण विभागाकडून व सामाजिक घटकांकडून आवश्यक त्या परवानग्या प्राप्त करणे.

३) पाण्याच्या पातळीत होणारा बदल याचा महिनानिहाय आलेख तयार करणे.

४) सदर प्रकल्पासाठी आवश्यक ती निष्कासन व्यवस्था उपलब्ध करून देणे.

५) सदर प्रकल्पाशी संबंधित सर्व बाबी/कामकाज/कार्यपध्दती/अंमलबजावणी व तदनुषंगिक मुदयांबाबतची निश्चिती करणे व आवश्यक कार्यवाही करणे.

**क) सदर समिती प्रकल्पाचा सर्व समावेश परिपूर्ण बृहत आराखडा २ महिन्यात तयार करून शासनास सादर करेल.**

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२११४३७३९६४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant
Pundalik
Badgeri

Digitally signed by Prashant Pundalik Badgeri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae61ab0caff4e0f24ac492ed7902d55ccf49e93124a5c1327133a6da9db8c748, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundalik Badgeri
Date: 2018.06.21 14:37:01 +05'30'

**(प्र.पुं. बडगेरी)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई,
४) विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन मुंबई,
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१०) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधार कंपनी मर्या.,मुंबई,
१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
१५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
१७) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
१८) उप सचिव/ ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९) ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०) निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.